# जॉर्ज वॉशिंग्टन कार्व्हर

डेविड अडलर,
चित्र: डैन ब्राउन
मराठी : अश्विनी बर्वे



# जॉर्ज वॉशिंगटन कार्व्हर



डेविड अडलर, चित्र: डैन ब्राउन मराठी : अश्विनी बर्वे

**जॉर्ज वॉशिंग्टन कार्व्हर** एक गुलाम म्हणून जन्माला आला. तो १८६४-की १८६५ मध्ये जन्माला आला. गृहयुद्धच्या समाप्ती झाल्यावर. पण त्याला याचा काही पत्ता नव्हता. तो अमेरिकेच्या मिसोरी प्रांतात मोसेस आणि सूजन कार्व्हरच्या फार्मवर जन्माला आला. त्याची आई – मेरी तिथं गुलाम होती.





जॉर्ज आपल्या आईला बिलकुल ओळखत नव्हता. कारण तो जेव्हा खूप छोटा होता तेव्हाच दरोडेखोरांनी धाड टाकून त्याला आणि त्याच्या आईला मेरीला पकडून अर्कानाससला घेवून गेले होते. तिथं एका शेजाऱ्याला जॉर्ज रस्त्यावर पडलेला दिसला. मग तो त्याला घेवून परत घरी आला. पण मेरीचा खूप शोध घेवूनही सापडली नाही. त्यानंतर जॉर्ज वॉशिंग्टन कार्व्हरने परत आपल्या आईला बघितलं नाही.



जॉर्जचे वडील सुद्धा एक गुलाम होते. पण जॉर्ज त्यांना सुद्धा कधी भेटला नव्हता. ते शेजारच्याच फॉर्मवर काम करत असत. जॉर्जच्या जन्माच्या वेळी झालेल्या एका दुर्घटनेत त्यांचा मृत्यू झाला.

जॉर्ज आणि त्याचा भाऊ जेम्स यांचे पालन पोषण मोसेस आणि सूजन कार्व्हरने केले. कार्व्हर दांपत्याने दोन्ही मुलांची खूप काळजी घेतली. जॉर्ज, मिस्टर कार्व्हर यांना “अंकल मोस” म्हणत असे.

जॉर्ज लहानपणी खूप अशक्त होता.त्याने नंतर लिहलं, “माझ्या शरीरात नेहमी जीवन आणि मृत्यू मध्ये युद्ध चालू असे,” म्हणून कार्व्हर दांपत्याने त्याला फॉर्मवरचे कठीण काम करू दिले नाही. तो जनावरांना चारा देत असे आणि मग घरातल्या कामकाजासाठी सूजन कार्व्हरला मदत करत असे. त्याला जवळच्या जंगलात फिरण्यास आणि पोहण्यास खूप वेळ मिळत असे.

जॉर्जचा आपली एक छोटी बाग पण होती. त्याने लिहलं आहे की, “मी प्रत्येक दगड, किडे, पक्षी आणि जनावर यांच्या बाबतीत जाणून घ्यायला उत्सुक होतो.” आणि पुढे “जर चुकून एखाद्या झाडाचे मूळ किंवा फुल माझ्याकडून कुस्करले गेले, तर मी दुःखाने अनेक वेळ रडत असे.”

त्याने आपली बाग लांब झाडामध्ये लपवून तयार केली होती. कारण त्या काळी लोक फुलांची झाडे लावण्याला एक नंबरचा मुर्खपणा समजत होते.



कार्व्हर दांपत्याला वाट्त होते की जॉर्जने सुद्धा इतर गोऱ्या मुलांसारखे वाचायला-लिहायला शिकावे. त्यांनी त्याला थोडे वाचायला आणि लिहायला सुद्धा शिकवले.

जॉर्जला खूप काही शिकायचे होते. त्याच्याजवळ फक्त एक पुस्तक होते, “वेबस्टर एलीमेंट्री स्पेल्लिंग बुक”. त्याने ते पुस्तक इतक्या वेळा वाचलं होतं, की ते आता त्याला पूर्ण पाठ होतं. पण त्या पुस्तकात जॉर्जच्या प्रश्नांची उत्तरं नव्हती.

बाराव्या वर्षी जॉर्ज जवळच नेओशो येथे आफ्रिकी-अमेरिकन मुलांच्या शाळेत शिकायला गेला.तिथं तो मारिया आणि एंड वाटकिंस- या अश्वेत दांपत्या बरोबर राहिला. राहण्याच्या आणि खाण्याच्या बदल्यात तो त्यांच्या घरातले कामकाज करत होता.



त्याची मारिया काकू एक नर्स होती. कोणत्या झाडांपासून आणि जडी बुटी पासून आजार बरे होतात, हे तो मारिया कडून शिकला. मारिया कडून तो वेळेचे महत्वही शिकला. दुपारच्या सुट्टीत शाळेतून घरी येवून तो मारिया काकूला कपडे धुण्यात मदत करत असे. त्याच्याजवळ खेळण्यासाठी वेळच नसे.



नेओशोतल्या शिक्षिकेला, जॉर्जबद्दल अधिक माहिती नव्हती. तिथं एक वर्ष राहिल्या नंतर जॉर्जला वाटलं की आता त्याला दुसरीकडे जायला हवं. मग त्याला एक कुटुंब भेटले जे फोर्ट स्कॉट, कॅन्सस येथे जात होते. ते ठिकाण तो जिथे राहत होता तिथून १०० मैल दूर होते. जॉर्ज त्यांच्या गाडीत बसून तिथं गेला.



फोर्ट स्कॉटमध्ये जॉर्जने एका शाळेत दाखला घातला. तो तिथं “विल्डर हाउस” नावाच्या हॉटेल मध्ये राहत होता. उपजीविकेसाठी तो एका किराणा दुकानात काम करत असे. आणि हॉटेल मध्ये राहणाऱ्या लोकांचे कपडे धूत असे. काही दिवस तो एका लोहाराच्या कुटुंबांबरोबर सुद्धा राहिला. तिथंही तो घरच्या कामात मदत करत असे.





मार्च १८७९ मध्ये फोर्ट स्कॉटमध्ये मुखवटा घातलेल्या गोऱ्या लोकांच्या गर्दीने एका काळ्या कैद्याला जेल मधून ओढून बाहेर काढलं. मग दोरीने बांधून खूप दूर पर्यंत ओढत नेले. नंतर त्यांनी त्या कैद्याला फाशी दिली आणि जाळून टाकले.

जॉर्ज वाशिंगटन कार्व्हरने ती बीभत्स घटना आपल्या डोळ्यांनी पाहिली.त्यानंतर लगेचच त्याने फोर्ट स्कॉट सोडलं. त्या अमानवीय हत्याकांडाच्या आठवणी जॉर्जला आयुष्यभर छळत राहिल्या.

तिथून जॉर्ज ओलाथे, कॅन्सासला गेला. त्यानंतर तो पोला आणि शेवटी मिनियापोलिस येथे गेला. तिथं जॉर्जने हायस्कूल पूर्ण केलं.

कार्व्हर मध्ये अजूनही ज्ञानाची ज़बरदस्त भूकं होती. १८८५ मध्ये त्याने पत्राने हायलंड युनिव्हर्सिटीत आपला अर्ज पाठवला. त्याचा अर्ज स्वीकारला गेला. पण जेव्हा जॉर्ज तिथं शिकण्यासाठी गेला तेव्हा त्याला सांगण्यात आलं की, 'अश्वेत' असल्याने त्याला तिथं प्रवेश मिळू शकणार नाही.



जॉर्ज वाशिंगटन कार्व्हरने मग आपली पुढची योजना बदलली.त्याने तिथून दूर, पश्चिमेला थोडीशी जमीन खरेदी केली आणि एक शेतकरी होण्याचा निश्चय केला. त्याने आपल्या हातांनी एका खोलीची झोपडी बनवली. तिच्या भिंती माती आणि पेंढ्याच्या आणि छत डामराचे पुठ्ठे आणि मातीचे केले होते. तिथं जॉर्जने भाज्या उगवल्या, कला शिकला आणि काही मित्र केले.



पण काही काळा नंतर जॉर्जला तिथंही बैचैन वाटलं. त्याला शिकण्याची खूप इच्छा होती. तिथून कार्व्हर पूर्वेला आयोवात गेला आणि तिथं त्याने सिम्पसन कॉलेज मध्ये प्रवेश घेतला. कार्व्हर त्या कॉलेजचा पहिला आफ्रिकी-अमेरिकन विद्यार्थी होता. तिथं त्याने कलेचे शिक्षण घेतले.पण  त्याच्या लवकरच लक्षात आले की कृषि आणि शेती तंत्र शिकला तरच तो त्याच्या लोकांना जास्त मदत करू शकेल. मग त्याने आयोवा स्टेट कॉलेज मध्ये बदली करून घेतली आणि तिथं त्याने शेतीच्या बाबतीत शिक्षण घेतले.



आयोवा स्टेट कॉलेज मध्ये कार्व्हरने वादविवाद स्पर्धा, जर्मन आणि कला क्लब मध्ये जोरदार भाग घेतला. तिथं तो फुटबॉल टीमचा कोच होता. तिथं त्याने प्रार्थना सभेचे नेतृत्व सुद्धा केले. देव आणि धर्म दोन्ही जॉर्ज साठी फार महत्वपूर्ण होते. म्हणून जेव्हा प्रकृतीचे तो निरीक्षण करायचा तेव्हा त्याला वाटायचे की तो देवाच्या निर्मितीच्या बाबतच शिकत आहे. आणि त्यामुळे तो देवाच्या अधिक जवळ पोहचेल.

जॉर्ज वाशिंगटन कार्व्हरने १८९४ मध्ये आयोवा स्टेट कॉलेजचा विद्यार्थी म्हणून डिग्री घेतली. नंतर तो त्याच कॉलेज मध्ये पहिला आफ्रिकी-अमेरिकन शिक्षक झाला. पण त्याच बरोबर त्याने आपलं शिक्षण चालू ठेवलं.
१८९६ मध्ये त्याने विज्ञान विषयातली मास्टर्स डिग्री घेतली.



१८९६ मध्ये त्या काळातले उच्च सन्मानित आफ्रिकी-अमेरिकन बुकर टी. वॉशिंग्टन यांनी कार्व्हरला अलाबामा येथे असणाऱ्या टक्सगी इन्स्टिट्यूट मध्ये काम करण्यासाठी आमंत्रित केले. या शाळेची स्थापना १८८१ मध्ये झाली होती आणि त्याचा उद्देश आफ्रिकी-अमेरिकनांना नोकरीसाठी पात्र होण्यासाठी प्रशिक्षण देणे असा होता. तिथं जॉर्ज  कार्व्हरला कृषि विभागाचे प्रमुख करण्यात आले. आपले बाकी आयुष्य कार्व्हरने तिथेच काम करत घालवले.





कार्व्हर, दक्षिण अमेरिकेत राहणाऱ्या लोकांचे विशेष करून आफ्रिकी-अमेरिकन लोकांचे जीवन अधिक चांगले करण्यासाठी कटिबद्ध होते. सतत कपाशीची शेती केल्याने तिथली जमीन ओसाड झाली होती. काही वर्षानंतर कपाशीचे पुरे पीक बॉल–विवील किड्यामुले भुईसपाट केले होते. हे किडे कपाशीच्या फुलांच्या कळयामध्ये अंडी देतात. आता कार्व्हर इतर पिकांचा पर्याय शोधण्याचा विडा उचलला, जे पीक दक्षिण अमेरिकेत सहजतेने उगवेल आणि शेतकऱ्यांना सहारा मिळेल.

लवकरच कार्व्हरने शोधले की तिथल्या जमिनीमध्ये भुईमुगाच्या शेंगा आणि रताळी पिकू शकेल. त्या दोन्ही पिकांना किड्यांचा सुद्धा धोका नाही.कार्व्हरने ती दोन पिकं म्हणजे देवाची भेट आहे असे समजले. कार्व्हरला माहित होते की उत्तर अमेरिकेतली रहिवासी दक्षिण अमेरिकेतले शेतकरी जितका भुईमुग आणि रताळी पिकवतील तेवढे खाऊ शकणार नाही.म्हणून कार्व्हरने त्या दोन पिकांचे शेकडो नवीन उपयोग शोधले.

आपल्या प्रयोगशाळेत कार्व्हरने शेंग्यापासून त्याचे चरबी (फॅट), डिंक, साखर, आदि द्रव्यांना वेगळे केले.






या सगळ्या घटकांवर कार्व्हरने काम केले आणि त्याने भुईमुगाचे तीनशे पेक्षा जास्त उपाय शोधले. त्यात भुईमुगाच्या शेंगाचे पीठ, दूध, पनीर, कॅन्डी, आईस्क्रीम, दही, शाम्पू, चेहऱ्याला लावण्यासाठी क्रिम, डिंक, वॉर्निश, आणि शाई या गोष्टींचा समावेश होता. कार्व्हरने संशोधन करून हे समजून घेतले की, शेंगदाण्याचे तेलाने जर पोलिओ झालेल्या माणसाला मालिश केली तर त्याला त्याचा फायदा होवू शकतो. पोलिओ मुलांना अपंग करत असे.

कार्व्हरने रताळ्यापासूनही शेकडो वस्तू बनवल्या. जसे की पीठ ,सरबत, कॉफी, खळ, डिंक, व्हेनिगर, दारू, आणि कृत्रिम रबर आदि गोष्टींचा समावेश होता.

जॉर्ज वाशिंगटन कार्व्हरला आपल्या कामात खूप मजा येत होती. ते नेहमी म्हणायचे, “आधी विज्ञान शिका, समजून घ्या, मग विज्ञान तुम्हांला मुक्ती देईल, कारण विज्ञानच ‘सत्य’ आहे.





कार्व्हर असे मानायचे की त्यांच्या सगळ्या शोधांमध्ये देवाचा हात आहे. म्हणून ते आपल्या कोणत्याही शोधाचा फायदा ते करून घेत नसत. नेहमी टस्क्गी इन्स्टिट्यूट कडून त्यांना मिळालेला पगाराचा चेक सुद्धा त्यांचा टेबल वर तसाच पडलेला असे. प्रसिद्ध शास्त्रज्ञ थॉमस अल्वा एडिसन यांनी कार्व्हरला अधिक वेतन देवून आपल्या प्रयोगशाळेत आमंत्रित केलं होतं.पण कार्व्हर यांनी टेक्सास सोडून यायला नकार दिला. ते आपल्या आफ्रिकी-अमेरिकन लोकांच्या उत्थानासाठी काम करू इच्छित होते.

जॉर्ज वाशिंगटन कार्व्हर यांचा संपूर्ण मानवतेच्या चांगुलपणावर गाढ विश्वास होता. ते म्हणत, “आपण सर्व लोक एक–दुसऱ्याचे भाऊ आहोत.” कार्व्हर मानत की त्यांच्या सारखे यशस्वी अश्वेत लोकांनी इतर लोकांचे रोल मॉडेल झालं पाहिजे. ज्यामुळे “सगळ्या दुनियेच्या डोळ्यात त्यांच्या वंशाबद्दलची छबी बदलेल.”









कार्व्हर यांना हे शब्द खूप प्रिय होते, “प्रत्येक गोष्ट जपून वापरा, जे तुमच्याकडे आहे त्यातूनच तुमच्या गरजा भागवा” १९४१ मध्ये बिया, शेंगा, कोंबडीचे पिस यांपासून केलेल्या चित्रांचे प्रदर्शन भरवले गेले होते. टेक्सासच्या या प्रदर्शनात कार्व्हरने तयार केलेले ७१ पेंटिंग होते. पेंटीग साठी वापरलेले रंग नैसर्गिक होते, जे कार्व्हरने भाज्या, फुलं आणि अलाबामाच्या माती पासून तयार केले होते. टाईम पेपरने त्या प्रदर्शनाची समीक्षा करतांना कार्व्हरला “ब्लाक लिओनार्दो” असा किताब दिला होता. लिओनार्दो द विन्ची, जगातले एक महान कलाकार होते, आणि ते विभिन्न विद्यामध्ये पारंगत होते.

जॉर्ज वाशिंग्टन कार्व्हर यांना त्यांच्या कामासाठी अनेक पुरस्कारांनी सन्मानित करण्यात आलं. १९२३ मध्ये नॅशनल असोसिएशन फॉर द अॅडव्हान्समेंट ऑफ कलर्ड पिपल या संस्थेने त्यांना “स्पिनग्रन मेडल” दिले. १९३९ मध्ये, त्यांना कृषि रसायन विज्ञान मध्ये उत्कृष्ट शोधासाठी *थिओडोर रूझवेल्ट मेडल* प्रदान केले गेले.





जॉर्ज वाशिंगटन कार्व्हर यांचे निधन ५ जानेवारी १९४३ मध्ये टस्कगी इन्स्टिट्यूट मध्ये झाले. सगळ्या जगाने या महान आत्माच्या मृत्यू झाला म्हणून दुःख व्यक्त केलं.

## प्रमुख तारखा

| | |
|---|---|
| १८६३ वा १८६४ | मिसौरी, अमरीकेत जन्म |
| १८८६ | नेसकंट्री,कॅन्सास मध्ये राहिले आणि तिथं आपली झोपडी बांधली |
| १८९१-१८९६ | आयोवा स्टेट कॉलेजमध्ये शिक्षण |
| १९२१ | अमेरेकी कॉग्रेसची एका कमेटीला भुईमुगाच्या शेंगांचे अनके उपाय सांगितले. |
| १९२१ | स्पिन्गर्ण मेडलने सन्मानित |
| १९३९ | रूझवेल्ट मेडलने सम्मानित |
| १९४३ | ५ जानेवारी टस्क्गी इंस्टिट्यूट, अलाबमा राज्यात निधन |

## लेखकाची नोट

जॉर्ज वाशिंगटन कार्व्हर जेव्हा १९२१ मध्ये कॉंग्रेस कमिटीच्या समोर उपस्थित राहिले तेव्हा त्यांच्या कामाचे खूप मोठ्या स्तरावर कौतुक केले गेले. त्यावेळी कॉंग्रेस विदेशातून आयात केलेल्या भुईमुगाच्या शेंगावर कर लावण्याचा विचार करत होती. त्या करामुळे अमेरिकेत भुईमुग पिकवणाऱ्या शेतकऱ्यांना खूप मदत झाली असती. कार्व्हरने भुईमुगाचे शेकडो उपयोग दाखवले. कार्व्हरच्या भाषणानंतर कॉंग्रेसने भुईमुगाच्या आयातीवर कर लावण्याचा निर्णय घेतला. त्यानंतर कार्व्हरला खूप प्रसिद्धी मिळाली.

बुकर टी. वाशिंगटन यांनी १८९५ मध्ये केलेल्या आपल्या भाषणात अश्वेत लोकांना म्हटलं, “जो जिथं असेल तिथं त्यानं आपली स्थिती बेहत्तर करायला पाहिजे” त्यांना असे वाटे की अश्वेत लोकांनी अमेरिकी व्यवस्थेमध्ये राहूनच काम करायला पाहिजे. कितीतरी गोष्टींमध्ये कार्व्हर आणि बुकर टी. वाशिंगटन यांचे वंशासंदर्भात मतांमध्ये समानता होती. १९३७ मध्ये कार्व्हरने लिहलं, “मी आपल्या लोकांना हे दाखवू इच्छितो, की रंगच फक्त त्यांच्या मागासलेपणाचे एकमेव कारण नाही.” अश्वेताचे अनेक क्रांतिकारी नेते जसे डब्लू. ई. बी. बोइस यांना कार्व्हरचे विचार पसंत नव्हते. त्यांना वाटे की अश्वेतांनी समान अधिकाराची मागणी करावी आणि त्यासाठी लढावे.